**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा खेड, ता. इगतपुरी, जि. नाशिक येथील इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शाआबां-२०१४/प्र. क्र. ४८४ /का.१३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०८ मे, २०१५.

वाचा:-

१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. शाआबां-२०१०/प्र.क्र. ३८७/का-१३, दिनांक १५-१०-२०१०.

२) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांचे पत्र क्र.शाआबां-२०१४/प्र.क्र.०१/का.८(२)/७१४५, दि. ०५.११.२०१४.

प्रस्तावना :-

एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा खेड, ता. इगतपुरी, जि. नाशिक या आश्रमशाळेच्या आश्रमशाळा संकुल इमारत बांधकामाला शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. शाआबां-२०१०/प्र.क्र.३८७/का-१३, दिनांक १५-१०-२०१० अन्वये रु. ४,७३.८१ लक्ष इतक्या खर्चाला प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी त्यांच्या दि.५.११.२०१४ च्या पत्रान्वये सदर इमारत बांधकामाबाबतचे रु.६,८५.६७ लक्ष रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०११-१२ च्या दरसुचीवर आधारीत आहे.

२. उपरोक्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने अंदाजपत्रक तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आले होते. सदर अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने खर्चाच्या अंदाजास सहमती दिलेली आहे. तसेच दि.१३-०३-२०१५ रोजी मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या सचिव समितीच्या बैठकीत सुधारीत अंदाजपत्रकास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार प्रस्तावाला सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांचे अंतर्गत शासकीय आश्रमशाळा खेड, ता. इगतपुरी, जि. नाशिक येथील आश्रमशाळा संकुल इमारत बांधकामाच्या

सविस्तर अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई यांनी छाननी करुन मूळ प्रशासकीय मंजूरी रकम रु. ४,७३,८१,१०१/- वर ४२.२०टक्के म्हणजेच रु.१,९९,९४,७९५/- इतकी वाढ करुन रु. ६,७३,७५,८९६/- (अक्षरी रुपये सहा कोटी त्र्याहत्तर लाख पंचाहत्तर हजार आठशे शहाण्णव मात्र) इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु-मोटो रिट याचिका क्र. १४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे व्हिडीओ शुटींग करुन त्याची सी.डी. शासनास सादर करणे बंधनकारक राहील. तसेच प्रस्तावित इमारतीचे बांधकाम किती मुदतीत पुर्ण करण्यात येणार आहे याबाबतचे लेखी पत्र संबंधित कंत्राटदार / ठेकेदार यांचेकडून प्राप्त करुन घेऊन ते शासनास तात्काळ सादर करावे.

४. बांधकामाचा दर्जा तसेच कामास होणारा विलंब यांवर देखरेख करण्याची जबाबदारी संबंधित आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास, प्रकल्प, नाशिक यांची राहील.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग यांचा अनौपचारीक संदर्भ क्र. ४२२ / इ.मा.- २, दि. ०९/१२/२०१४ अन्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१११७०२५३९२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2015.06.11 17:05:11 +05'30'

( नवनाथ वाठ )

कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग.

**प्रत,**

१) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

२) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक, जि. नाशिक.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नाशिक, जि. नाशिक.

५) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक, जि. नाशिक .

६) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई .

७) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

९) आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक, जि. नाशिक.

१०) कक्ष अधिकारी (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

११) कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

१२) निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

-----------------------